**अमरावती विभागातील महाराष्ट्र विकास सेवा,**
**गट-ब मधील अधिका-यांच्या बदल्या/नियुक्त्या**

# महाराष्ट्र शासन

**ग्राम विकास व जलसंधारण विभाग**
**शासन आदेश, क्रमांक : मविसे १० / २०११ /प्र.क्र. ४५ /आस्था-३अ**
**मंत्रालय,मुंबई-४०० ०३२**
**दिनांक:- ०१ ऑगस्ट, २०११**

**आदेश :-** सार्वजनिक सेवेच्या हितार्थ महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्य पार पांडतांना होणा-या विलंबास प्रतिबंध अधिनियम,२००५ मधील तरतुदीनुसार बदली करण्यास सक्षम असलेल्या प्राधिका-यांच्या मान्यतेने आणि पदावधी पूर्ण होण्यापूर्वी बदली प्रस्तावित असलेल्या अधिका-यांच्या बाबतीत कलम ४ (४) व (५) मधील तरतुदीनुसार सक्षम प्राधिका-याच्या पूर्वमान्यतेने ग्राम विकास व जलसंधारण विभागातील खालील अधिका-यांच्या बदल्यांचे आदेश शासन देत आहे. बदलीनंतर संबंधित अधिका-यांची नियुक्ती त्यांच्या नांवासमोरील स्तंभ क्रमांक ४ मध्ये दर्शविलेल्या पदावर करण्यात येत आहे.

| अ.क्र | अधिका-याचे नांव | सध्याचे पद व ठिकाण | बदलीने नियुक्तीचे पद व ठिकाण | शेरा |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | श्री.बी.एस.रायबोले | बाल विकास प्रकल्प अधिकारी, धारणी, अमरावती | गट विकास अधिकारी, पंचायत समिती, देऊळगावराजा, जि.बुलढाणा | श्री.एस.टी.चव्हाण यांच्या बदलीने रिक्त झालेल्या पदावर |
| २ | श्री.यु.एस.मानकर, | गट विकास अधिकारी, पंचायत समिती बाभुळगांव, जि.यवतमाळ, | गट विकास अधिकारी, पंचायत समिती, धामणगाव रेल्वे, जि. अमरावती | रिक्त पदी दि. २५.५.२०११ च्या आदेशात अंशतः बदल करुन |
| ३ | श्री. पी. के. कापडे | गट विकास अधिकारी, पंचायत समिती, अचलपूर, जि. अमरावती | गट विकास अधिकारी, पंचायत समिती, मानोरा, जि.वाशिम | श्री.के.बी.श्रीवास्तव यांच्या बदलीने रिक्त झालेल्या पदावर |
| ४ | श्री. आर. जी. गेडाम | गट विकास अधिकारी, पंचायत समिती, झरी जामनी, जि. यवतमाळ | गट विकास अधिकारी, पंचायत समिती अचलपूर, जि. अमरावती | श्री. पी. के. कापडे यांच्या बदलीने रिक्त होणा-या पदावर |
| ५ | श्री. बी. एन. लांभाटे | बाल विकास प्रकल्प अधिकारी, दिग्रस, जि. यवतमाळ | गट विकास अधिकारी, पंचायत समिती, झरी जामनी, जि.यवतमाळ | श्री. आर. जी. गेडाम यांच्या बदलीने रिक्त होणा-या पदावर |
| ६ | श्री. एस. पी. थोरात | बाल विकास प्रकल्प अधिकारी, अकोला, जि. अकोला | गट विकास अधिकारी, दर्यापूर, जि. अमरावती | दि.२५.५.२०११ च्या आदेशात अंशतः बदल करुन (रिक्त पदी) |

| अ.क्र | अधिका-याचे नांव | सध्याचे पद व ठिकाण | बदलीने नियुक्तीचे पद व ठिकाण | शेरा |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| ७ | श्री. रमण तेलगोटे | गट विकास अधिकारी, पंचायत समिती, खामगाव, जि. बुलढाणा | बाल विकास प्रकल्प अधिकारी, तेल्हारा, जि. अकोला | रिक्त पदी |
| ८ | श्री. जयंत बाबरे | बाल विकास प्रकल्प अधिकारी, देऊळगावराजा, जि. बुलढाणा | बाल विकास प्रकल्प अधिकारी, मोर्शी, जि. अमरावती | श्री. के.आर. तापी यांच्या बदलीने रिक्त झालेल्या पदावर |
| ९ | श्रीमती सविता बेलखेडकर | बाल विकास प्रकल्प अधिकारी, दर्यापूर, जि. अमरावती | बाल विकास प्रकल्प अधिकारी, मुर्तिजापूर, जि.अकोला | दि.२५.५.२०११ च्या आदेशात अंशतः बदल करुन (रिक्त पदी) |
| १० | श्री. एस. एम.कुलकर्णी | बाल विकास प्रकल्प अधिकारी, मालेगाव, जि. वाशिम | बाल विकास प्रकल्प अधिकारी, अकोला, जि.अकोला | दि.२५.५.२०११ च्या आदेशात अंशतः बदल करुन (श्री एस पी थोरात यांच्या बदलीने रिक्त झालेल्या जागी) |

२. संबंधित अधिका-यांनी त्यांच्या नवीन पदाचा पदभार त्वरीत स्वीकारावा. तसेच त्यांनी अनधिकृत रजेवर जाऊ नये. त्यांचे लक्ष सामान्य प्रशासन विभागाच्या क्रमांक : सीडीआर १०८२ / २५६७ / २८ / अकरा, दिनांक ३०.८.१९८२ च्या परिपत्रकाकडे वेधण्यात येत आहे. त्यात दिलेल्या सूचना लक्षात घेऊन बदली रद्द करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास, ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील याची त्यांनी नोंद घ्यावी.

३. संबंधित विभागीय आयुक्त / मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी बदली झालेल्या अधिका-याला त्यांच्या सध्याच्या पदभारातून पदमुक्त करावे व त्यांना नवीन नेमणूकीच्या जागी तात्काळ रुजू होण्यास सांगावे.

४. संबंधित अधिका-यांनी नवीन नियुक्तीच्या ठिकाणी हजर व्हावे व पदभार स्वीकारल्याचा दिनांक शासनास कळवावा.

५. सदर आदेश महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०११०८०११७५८१२००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**( सरिता बांदेकर-देशमुख )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति

१. संचालक, एकात्मिक बाल विकास सेवा योजना संचालनालय, नवी मुंबई

२. विभागीय आयुक्त, अमरावती विभाग, अमरावती
३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, (संबंधित सर्व)
४. महालेखापाल- २ ( लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र राज्य, नागपूर
५. संबंधित अधिकारी द्वारा मु.का.अ.जि.प यांचे मार्फत
६. मा.मंत्री ( ग्राम विकास ) यांचे खाजगी सचिव
७. मा.राज्यमंत्री ( ग्राम विकास ) यांचे खाजगी सचिव
८. मा.सचिव ( ग्राम विकास व पंचायत राज ) यांचे स्वीय सहायक.
९. कार्यासन क्रमांक : आस्था - २ ग्राम विकास व जलसंधारण विभाग
१०. निवड नस्ती ( कार्यासन क्रमांक :आस्था-३अ ) ग्राम विकास व जलसंधारण विभाग.